आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२१-२२ या वर्षात “लहान पाटबंधारे” योजनेकरीता निधी वितरण.
लेखाशीर्ष (४७०२ ७७२१)

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२१/प्र.क्र. ११/ कार्यासन-६**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख : ३१ मार्च, २०२२.

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४.०६.२०२१, दि.१४.१०.२०२१, दि.२८.०१.२०२२, दि.१७.०३.२०२२.
२) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय, क्र.बीयुडी-२०२१/ प्र.क्र.११/ कार्या-६, दि.२८.१२.२०२१, दि.८.०२.२०२२.
३) मृद व जलसंधारण विभागाची नस्ती क्र. भूसंपा-२०२१/प्र.क्र.३२१/जल-४,

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत मृद व जलसंधारण विभागामार्फत अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या राज्य एकत्रित निधीअंतर्गत लहान पाटबंधारे योजनेंतर्गत ठाणे जिल्हयातील पेंढरी, ता. मुरबाड येथील लघु पाटबंधारे या योजनेकरीता संपादित केलेल्या खाजगी जमिनीची मोजणी फी, वकीलामार्फत Title Search Report तयार करणे, तसेच माती धरण काटछेद संकल्पन सल्ला मसलत तत्वावर करणे यासाठी रु.११.५१ लाख इतका निधी संदर्भाधीन क्रमांक २ येथील दि.८.०२.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला होता. आता संदर्भाधीन क्र.३ येथील नस्तीवर पेंढरी, ता. मुरबाड येथील लघु पाटबंधारे कामाकरीता वन विभागाचे मंजूरी प्रस्तावाच्या (Forest clearance) देयकाकरीता रू.११.८४ लाख इतका निधी वितरीत करण्यास वित्त विभागाने सहमती दर्शविली आहे. यास अनुसरून निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत अनुसूचित जमाती घटकासाठी मागणी क्र.टी-६, मधील मुख्य लेखाशीर्ष ४७०२, लहान पाटबंधाऱ्यांवरील भांडवली खर्च, ७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) (१८)-राज्य एकत्रित निधी अंतर्गत लहान पाटबंधारे योजना (४७०२ ७७२१), ५३-मोठी बांधकामे यासाठी सन २०२१-२२ या वर्षात रु.७५००.०० लाख इतकी तरतूद सुधारीत अंदाजांत मंजूर आहे. सदर तरतुदींतून वित्त विभागाने मान्यता दिल्यानुसार राज्य एकत्रित निधी अंतर्गत लहान पाटबंधारे योजनेंतर्गत ठाणे जिल्हयातील पेंढरी, ता. मुरबाड येथील लघु पाटबंधारे या योजनेकरीता वन विभागाचे मंजूरी प्रस्तावाच्या (Forest clearance) देयकाकरीता रू.११.८४ लाख इतका निधी मृद व जलसंधारण विभाग यांना अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

**(रु.लाखात)**

| **योजनेचे नाव** | **लेखाशिर्ष** | **बाब** | **सन २०२१-२२ मधील अर्थसंकल्पीत तरतुद** | **सुधारीत अंदाज २०२१-२२** | **यापुर्वी वितरीत निधी** | **या शा.नि. द्वारे वितरीत करण्यात येत असलेला निधी** |
|---|---|---|---|---|---|---|
| राज्य एकत्रित निधी अंतर्गत लहान पाटबंधारे योजना | ४७०२ ७७२१ | ५३-मोठी बांधकामे | ७५००.०० | ७५००.०० | ८०३.६० | ११.८४ |

२. उपरोक्त प्रमाणे **एकूण रु.११.८४ लाख (अक्षरी रुपये अकरा लाख चौऱ्याऐंशी हजार फक्त)** इतका निधी प्रशासकीय विभागप्रमुख म्हणून सचिव, मृद व जलसंधारण विभाग यांना वितरीत करण्यात येत आहे. सदर निधीचा विनियोग ठाणे जिल्हयातील पेंढरी, ता. मुरबाड येथील लघु पाटबंधारे या योजनेकरीता ठाणे जिल्हयातील पेंढरी, ता. मुरबाड येथील लघु पाटबंधारे या योजनेकरीता वन विभागाचे मंजूरी प्रस्तावाच्या (Forest clearance) देयकाकरीता करण्यात यावा.

३. विभागप्रमुख/नियंत्रण अधिकारी यांनी सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ येथील शासन आदेशान्वये दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

४. सदर उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून नियंत्रक अधिकारी यांनी झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

५. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या वाचा येथील क्र.१ येथील शासन निर्णयान्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारात व अनौपचारिक संदर्भ क्र.४१०/ व्यय-१४, दि.२८.०३.२०२२ अन्वये दर्शविलेल्या सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३२९१३३९५५१६२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAVINDRA D AUTE

Digitally signed by RAVINDRA D AUTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=f05a6913f9dee1f453c9a1c5a89d8c4897737ba8e4ac0edf3f2c6e69e25f4108,
pseudonym=C4ECFFC229308BD3BD1E334FAC78848FBF7F7613,
serialNumber=CA98EFAC317508AB9B5820B47955BC1BABB173F20D25ABD816ED91A9B6B0F16C, cn=RAVINDRA D AUTE
Date: 2022.03.31 16:08:59 +05'30'

**( रविंद्र दि. औटे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. अप्पर मुख्य सचिव, मृद व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
५. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
६. वित्त विभाग ( अर्थसंकल्प- १९/ व्यय १४ ), मंत्रालय, मुंबई.
७. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा मजला, विधानभवन, मुंबई.
८. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
९. कार्यासन क्र. २ व ५, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१०. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग.